महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील सहायक गट विकास अधिकारी यांच्या विनंती बदलीबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन आदेश क्रमांकः** RDD-14011/20/2025-RDD(Est-3A)/14

३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: ३० मे, २०२५

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार, बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदी, नागरी सेवा मंडळाची शिफारस व बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील श्री.संगमेश म. कानडे, सहायक गट विकास अधिकारी यांना विनंती बदलीने खालीलप्रमाणे पदस्थापना देण्याचे शासन आदेश देत आहे. संबंधित अधिकारी यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | विनंती बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.संगमेश म. कानडे,<br>सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चाकूर, जिल्हा लातूर | सहायक गट विकास अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद, लातूर | रिक्त पदी |

**०२.** सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.०८.१९८२ च्या शासन परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेत बदल/नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

०३. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी संबंधित अधिकारी यांना, त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रूजू होण्यास सांगावे. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास ई-मेलद्वारे सादर करावा.

०४. संबंधित अधिकारी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी विहित कालावधीत पदस्थापना झालेल्या पदावर रूजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याविरूध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी विभागीय आयुक्त यांच्यामार्फत शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१६३४२३८१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.05.30 21:38:08 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा, लातूर.
९. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
१०. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.